# जेस्सी ओव्हन्स

## ऑलिंपिक हीरो



# जेस्सी ओव्हन्स

## ऑलिंपिक हीरो



शाळेत जाण्याआधी रोज सकाळी किशोरवयीन जेस्सी ओव्हन्स आणि त्याचे प्रशिक्षक मैदानावर भेटत असत. जेस्सी पुढील पंचेचाळीस मिनिटे तिथे धावण्याचा सराव करत असे. मग घाईघाईने आपल्या वर्गात जात असे. खरंतर, दुपारी टीममधील इतर मित्रांसोबत सराव करण्यास त्याला आवडत असे. पण ते त्याला शक्य नव्हते. कारण त्यावेळी तो उदरनिर्वाहासाठी काम करत असे. त्याच्या कमाईतूनच त्याच्या कुटुंबाचा गाडा चालत असे.

जेस्सीला सकाळी सकाळी सराव करण्याचा खूप कंटाळा येई. परंतु प्रशिक्षक चार्ल्स रिले मात्र सरावासाठी नेहमी न चुकता हजर राहात. यामुळे तरूण जेस्सीलाही सकाळी जाणे भाग पडत असे. पण त्यामुळे आपला फायदाच झाला, असे जेस्सीला नंतर वाटले. दिवस सरू लागले तसतसे आपण खूप वेगाने धावू लागलोय, हे जेस्सीला स्वतःलाच जाणवू लागले. वसंत ऋतूत एके सकाळी त्याने शंभर यार्ड एवढे अंतर पार केले. पण यावर मिस्टर रिले यांनी दिलेली प्रतिक्रिया जेस्सी समजू शकला नाही.

जेस्सी अंतिम रेषेवर पोहोचताच प्रशिक्षक रिले यांनी आपले स्टॉपवॉच बंद केले. त्यांनी पुन्हा एकवार आपल्या घड्याळाकडे पाहिले. पुन्हा एकदा पाहून त्यांनी मान हलवली. मग त्यांनी घड्याळ आपल्या कानांजवळ नेले. ते व्यवस्थित काम करत आहे याची खात्री केली. जेस्सी हे सगळं बघत उभा होता. “आपण काही चुका तर केल्या नाहीत ना!” जेस्सीच्या मनात आले.

रिले यांनी खिशातून अंतर मोजणारी टेप काढली आणि ते अंतर मोजले. दुसऱ्यांदा जेव्हा मिस्टर रिले यांनी हेच अंतर पुन्हा मोजले, तेव्हा मात्र जेस्सी खूप हैराण झाला. “काही गडबड आहे का?” न राहावून जेस्सीने विचारले.



मग रिले भांबावलेल्या जेस्सीजवळ आले. त्यांनी त्याच्या खांद्यावर हात ठेवला आणि म्हणाले, “जेस्सी, तू आता जसं धावलास तसं कोणताही शालेय धावपटू आजवर धावला नाही. तू शंभर यार्ड अंतर पार करण्याचा नवा विश्वविक्रम रचलायस.”

जेस्सी आश्चर्यचकीत झाला. क्लिव्हलंड, ओहायो या राज्यांतील इतर शाळांच्या धावपटुंच्या तुलनेत आपण वेगाने धावू शकतो, याची जेस्सीला खात्री होती. पण विश्वविक्रम! त्याची अपेक्षा नव्हती. अर्थात, सरावादरम्यान केलेला हा विश्वविक्रम कुठेही नोंदला जाणार नव्हता. पण आपण जर एवढ्या वेगात धावू शकतो तर पुन्हा असा विश्वविक्रमसुद्धा करू शकतो, हा विश्वास जेस्सीला वाटू लागला.

त्याला आता फक्त एक संधी
हवी होती.





जेम्स क्लिव्हलंड ओव्हन्स (जे. सी. ओव्हन्स) याचा जन्म 12 सप्टेंबर 1913 रोजी झाला. पण हे अशक्त मूल फार दिवस जगेल असे वाटत नव्हते. कुणाला कल्पना नव्हती की हा मुलगा एक दिवस जगातील सर्वात वेगाने धावणारी व्यक्ती बनेल.

जे.सी.चे बालपण अलाबामा राज्यातील ओकविल नावाच्या छोट्या शहरात अत्यंत हलाखीत गेले. त्याचे आईवडिल, हेन्री आणि एम्मा ओव्हन्स, दुसऱ्याच्या मालकीची शेती कसत असत. ते पन्नास एकराच्या शेतात राहात असत. तिथे ते शेतमालक जॉन क्लेननसाठी कापसाचे पीक काढत.

क्लेनन यांच्याकडे अडीचशे एकर जमीन होती. त्यावर आठ कुटुंबे शेती करत. हे शेतकरी कापसाचे बियाणे मालकाकडूनच खरेदी करत. बियाणे पेरून ते पीक काढत आणि मग उगवलेले पीक कापत. पीक बाजारात विकल्यावर होणारा नफा शेतमालक आणि शेतकरी आपापसात वाटून घेत.

शेतीची ही व्यवस्था वरवर आकर्षक दिसत असली तरी वास्तव काही वेगळेच होते. शेतकऱ्यांना अन्न, कपडे, अवजारे, बियाणे आणि गरजेच्या इतर वस्तू शेतमालकाकडूनच खरेदी कराव्या लागत. शेतमालक वर्षाच्या शेवटी शेतकऱ्यांना त्यांच्यावर असलेल्या कर्जाचे हिशोब दाखवत असे. शेतकऱ्याच्या वाट्याचा नफा या कर्जाची थोडी परतफेड म्हणून तो स्वत:कडेच ठेवत असे. मुळात, शेतकऱ्याच्या वाट्याला कमी नफा येत असे. यामुळे त्याच्यावर मालकाचे कर्ज वाढत जात असे. वर्षानुवर्षे शेतकरी कर्जात खोल बुडत जात आणि अधिकाधिक गरीब बनत. मालकाच्या हिशोबांवर आक्षेप घेणाऱ्या शेतकऱ्यांना मालक शेत सोडून निघून जाण्यास सांगत.

जे.सी.चे आईवडिलही इतर शेतकऱ्यांसारखे मालकाला नाराज करण्यास कचरत. आपला मालक मिस्टर क्लेनन आपल्याला फसवतोय, हे कळूनसुद्धा ते काही करु शकत नसत. अक्षरवाचन, गणित यांचे त्यांना ज्ञान नव्हते. त्यामुळे हिशोबवह्यांतील आकडेमोडी, बिले वगैरे तपासणे त्यांना शक्य होत नव्हते.



ओव्हन्स दांपत्य एका बाबतीत नशीबवान होते. त्यांची सहा काटक मुले त्यांना शेतकामात हातभार लावत असत. फक्त अशक्त जे.सी. आजारपणामुळे त्यांना मदत करू शकत नसे. इतर कुटुंबीय त्याच्या खाण्यापिण्याची आणि तब्येतीची काळजी घेत.



दर हिवाळ्यात जे.सी.ला न्युमोनिया होत असे. खोकला आणि तापाने तो बेजार होई. पण त्याच्या उपचारासाठी त्यांच्याकडे औषधे नव्हती. ओकविलमध्ये कुणी डॉक्टरसुद्धा नव्हता. एखादा डॉक्टर मिळालाच तरी त्याची फी देण्यासाठी त्यांच्याकडे पैसा नव्हता.

गरीबी हे जे.सी.च्या आजारपणाचे एक कारण होते. ते पुठ्ठे, जुनीपुराणी फळकुटे यांपासून बनवलेल्या झोपड्यात राहात. पाऊस आला की झोपडीच्या छतातून पाणी गळे. वाऱ्याचे गार झोत वेगाने झोपडीत शिरत. बाहेरच्या थंडीइतकीच थंडी घरातदेखील जाणवत असे.

झोपडीत जे.सी.ची आई शेकोटी करून जेवण बनवत असे. तेवढी जागा मात्र उबदार वाटे. झोपडीत ना शेगडी होती, ना पाणी, ना बाथरूम, ना काही फर्निचर! रात्री कडाक्याच्या थंडीत जे.सी.ची आई त्याला उबदार ब्लँकेटमध्ये लपेटून शेकोटीजवळ झोपवत असे.

त्यांना पोटासाठी पुरेसे अन्नही मिळत नसे. झोपडीच्या मागच्या जागेत जे.सी.च्या आईची भाज्यांची छोटीशी बाग होती. बागेतील बटाटे, धान्य, मका खाऊन ते आपली भूक भागवत. जे.सी.चा कुणी भाऊ ससा शिकार करून आणे तेव्हाच त्यांना मांस खायला मिळे. बरेचसे खाण्याचे जिन्नस त्यांना मालक क्लेननच्या दुकानातूनच खरेदी करावे लागत. ईस्टर आणि ख्रिसमस या वर्षातून दोनच दिवशी ओव्हन्स कुटुंबियांना डुकराचे मांस खायला मिळे.

1919 साली, सहा वर्षांचा असताना, हिवाळ्यात जे.सी.ची तब्येत खूपच खराब झाली. त्याला नुसता न्युमोनियाच झाला नाही तर त्याच्या डाव्या पायावर एक गाठही आली. दिवसेंदिवस ती गाठ मोठी होत गेली. गाठीच्या जागी खूप वेदना होत असल्यामुळे तो लंगडत चालू लागला. त्याच्या आईने गाठीच्या जागी गरम शेक दिला. पण त्याचा काही उपयोग झाला नाही.

जे.सी.च्या आईला त्याच्या जीवाची चिंता वाटू लागली. तिने जे.सी.ला पालथे झोपवले आणि म्हणाली, “हे बघ, मी जे काही करतेय त्याने तुला खूप वेदना होतील. तुला त्या सहन कराव्याच लागतील.” मग जे.सी.चा मोठा भाऊ आणि त्याचे वडील यांनी जे.सी.ला घट्ट धरून ठेवले. त्याच्या आईने जे.सी.ची गाठ अक्षरश: कापून काढली. जे.सी.ला प्रचंड वेदना झाल्या आणि रडू येऊ नये म्हणून त्याने खूप प्रयत्न केले.

जे.सी.ला ती घटना चांगलीच लक्षात राहिली, “आईला जे करायचे होते ते तिने केले......पण गाठ कापल्यामुळे माझा फायदाच झाला......कारण त्यानंतर कोणत्याही शारीरिक जखमेचे मला काही वाटेनासे झाले.”





काही वर्षांनंतर जे. सी. ओव्हन्स एक जागतिक स्तरावरील धावपटू बनला. बालपणीच्या त्या अनुभवामुळे दु:ख आणि थकवा सहन करण्याची त्याची क्षमता वाढली. कितीही थकवा आला, कितीही जखमी असला तरी त्याचे दु:ख त्याला गाठ कापण्याइतके वेदनानायी वाटत नसे.

हिवाळा सरून वसंत ऋतू आला. जे.सी.च्या पायावरची गाठ नाहीशी झाली. तो न्युमोनियाच्या आजारातून बरा झाला. घराबाहेर पडून धावू लागण्याइतपत सक्षम झाला. 'धावणे' ही गोष्ट जे.सी.ला खूप आवडू लागली. कारण त्याचे वडील त्या संपूर्ण प्रांतात सर्वात वेगवान धावपटू होते.

रविवारी चर्चमधील प्रार्थनेनंतर, तेथील लोक आराम करत, इथेतिथे बसून गप्पा मारत किंवा बायबलमधील गीते गात. हवामान सुखद असले की पुरूष मंडळी आपापसांत धावण्याची शर्यत लावत. जे.सी.चे वडील प्रत्येक शर्यत जिंकत. त्यामुळे जे.सी.ला त्यांचा अभिमान वाटे. आपल्या वडिलांना कापूस वेचणाऱ्या शेतकऱ्याऐवजी एका धावपटुच्या वेशात बघणे, त्याला जास्त आवडे. जे.सी.ला धावपटुंचे जग मुक्त वाटले. मग त्याला एकाच गोष्टीचा ध्यास लागला – 'आपण जगातील सर्वात वेगवान धावपटू बनायचे'.

'धावणे' हा जणू जे.सी.चा छंदच बनला. कारण खेळण्यासाठी त्याच्याकडे खेळणी नव्हती, आसपास त्याच्या वयाची मुले नव्हती. त्याची भावंडे सतत आईवडिलांसोबत शेतात काम करत. ओकविलमध्ये काळ्या वर्णाच्या लोकांसाठी शाळा नव्हती. त्यामुळे जे.सी. शाळेतही जाऊ शकत नव्हता.

जे.सी.च्या आईवडिलांच्या मनात शेतावरचे कष्टमय आयुष्य सोडून पळून जाण्याचे विचार अनेकदा येत. अमेरिकेच्या उत्तर भागात जगण्यासाठी चांगल्या संधी उपलब्ध होऊ शकतील, असे त्यांना वाटे.

परंतु ते पळून जाण्यास घाबरत. ओकविल हे एकच शहर त्यांच्या परिचयाचे होते. जवळच्या डेकाटर या शहराच्या पुढे ते कधीच गेले नव्हते. उत्तर भागात त्यांच्या ओळखीचे कुणी राहात नव्हते. त्या अज्ञात जगात जाणे त्यांना काहीसे असुरक्षित वाटत होते. त्यामुळे प्रत्येक वेळी चर्चा आणि वाद केल्यावर जे.सी.चे आईवडील ओकविलमध्येच राहाण्याचा निर्णय घेत.

फेब्रुवारी 1921 मध्ये दोन घटना घडल्या ज्यामुळे त्यांना आपला निर्णय बदलावा लागला.



जे.सी.ला पुन्हा न्युमोनिया झाला. यावेळी त्याची स्थिती खूपच गंभीर झाली. खोकल्यावर त्याच्या थुंकीतून रक्त बाहेर पडू लागले. आठ वर्षांचं आपलं हे मूल आता काही जगत नाही, अशी भीती त्याच्या आईला वाटू लागली.



त्याच महिन्यात मालक क्लेननने शेतातून ओव्हन्स कुटुंबाला मिळणारा उत्पन्नाचा वाटा कमी केला. जे.सी.च्या वडिलांनी याला विरोध केला. तेव्हा मालकाने, “माझ्या शेतावर राबणाऱ्याला उत्पन्नात यापेक्षा जास्त वाटा घेण्याचा हक्क नाही,” असे त्याला सुनावले. ओव्हन्स कुटुंबाकडे दोनच पर्याय होते – मालकाची अट मान्य करणे किंवा ते शेत सोडून निघून जाणे.

पुढचे दोन दिवस जे.सी.च्या वडिलांनी मौन पाळले. रविवारी चर्चमधील प्रार्थनेनंतर त्यांनी कुटुंबियांना मालकाशी झालेला वाद आणि आपला निर्णय सांगितला. कुटुंबियांनी त्यांच्या निर्णयानुसार उत्तर भागात जाऊन स्थायिक होण्याचे ठरवले.

त्यांनी आपल्याकडील पाच खेचरे आणि शेतअवजारे विकून काही पैसा उभा केला. यातून त्यांना रेल्वे प्रवासाची तिकिटे खरेदी करता आली. जे.सी.च्या वडिलांना दुसरे काम मिळेपर्यंत उरलेल्या पैशांत काही दिवस गुजराण करता येणार होती.

ओव्हन्स कुटुंबियांनी आपल्या नव्या घरासाठी ओहायो राज्यातील क्लिव्हलंड शहर निवडले. ते क्लिव्हलंडमध्ये कुणालाही ओळखत नव्हते. पण राहाण्यासाठी आणि काम करण्यासाठी ते शहर सोयीस्कर आहे, असे त्यांनी ऐकले होते. 1921 सालच्या वसंत ऋतूत ओव्हन्स कुटुंबाने आपल्या सामानाची बांधाबांध केली. राष्ट्रीय महामार्गाद्वारे सर्व कुटुंबीय उत्तर भागाकडे निघाले. क्लिव्हलंडला पोहोचल्यावर त्यांनी शहराच्या पूर्व भागात एका तीन मजली लाकडी इमारतीत लहानसे घर भाड्याने घेतले.

तरूण जे.सी.साठी हे शहर म्हणजे एक नवीन रोमांचक जग होते. तिथे फुटपाथ होते, पक्के रस्ते होते, असंख्य घरे होती. त्याच्या या नवीन घरामध्ये पाणी आणि वीज या दोन्ही सुविधा होत्या.

घराच्या उत्तरेकडे चालल्यावर जे.सी. रमणीय एरी कालव्याकाठी पोहोचत असे. तिथे माल लादून दूरवर चाललेल्या बोटी दिसत. घराच्या पूर्वेकडे चालल्यावर हिरवाईने नटलेली सुंदर बाग दिसे. बागेतील तळ्यात मुले खेळण्यातील नावा सोडण्याची मजा घेत.



जे.सी.च्या घराच्या दक्षिण आणि पश्चिम दिशेत अनेक दुकाने होती, विजेवर चालणाऱ्या गाड्या होत्या, सिनेमाघरे होती आणि रात्रभर रस्ते उजळणारे दिवे होते.



सर्वात चांगली घटना म्हणजे, जे.सी. शाळेत जाऊ लागला. तो सेंट क्लेअर ग्रामर स्कूलमध्ये जाऊ लागला. शाळेच्या पहिल्या दिवशी तो खूप उत्साहीत होता. शिक्षिकेने लाजाळू जे.सी.ला त्याचे नाव विचारले, तेव्हा तो पुटपुटला, "जे.सी." शिक्षिका हसून म्हणाली, "नव्या शाळेत तुझे स्वागत आहे, जेस्सी." कुमार जे.सी. बावरला आणि आपले योग्य नाव शिक्षिकेला सांगण्याची हिंमत काही त्याला झाली नाही. त्यामुळे शाळेत त्याच्या नावाची नोंद 'जेस्सी' ओव्हन्स अशीच झाली. जेस्सीला आपल्या नावाचा हा उच्चार भावला आणि पुढे हेच नाव त्याने कायम ठेवले.

जेस्सीला शाळेत मजा येऊ लागली. तो लिहा-वाचायला, हिशोब करायला शिकला. तिथे समवयस्क मित्र मिळाले, म्हणून तो खुश होता. पण शाळा सुटल्यावर तो पुन्हा या मित्रांसोबत खेळू शकत नसे. कारण नंतर तो कुटुंबाच्या चरितार्थासाठी काम करत असे.

जेस्सीच्या आईवडिलांना वाटले होते तसे क्लिव्हलंडमधील जीवन सहजसोपे नव्हते. जेस्सीच्या वडिलांकडे कुठलेही औपचारीक शिक्षण वा कौशल्य नव्हते. त्यांना सुरक्षित नोकरी मिळणे कठीण होते. अशा स्थितीत जेस्सीच्या आईने आणि मुलांनी काम करणे आवश्यक बनले. शाळा संपल्यावर जेस्सीने स्थानिक फुलांच्या दुकानात काम स्वीकारले. मग गॅसोलिन इंधनाच्या स्टेशनवर, किराणा दुकानामध्ये काम केले, बूट पॉलिश केले, मिळेल ते काम त्याने केले.

जेस्सीची तब्येत नव्या शहरात बरी होती. अजूनही तो तसा बारीक आणि दुबळा होता. तरीही त्याने प्रशिक्षक चार्ल्स रिलेचे लक्ष वेधून घेतले. रिलेने दुपारच्या सुट्टीत जेस्सीला शाळेच्या मैदानावर धावताना पाहिले. चार्ल्स रिले जेस्सीच्या शाळेत शारीरिक शिक्षण आणि क्रिडा विषयाचे शिक्षक होते. ते फेअरमोंट ज्युनियर हायस्कूल आणि ईस्ट टेक्निकल हायस्कूलमध्येही प्रशिक्षक होते.

रिले यांनी जेस्सीला विचारले, “धावण्याचा सराव करणाऱ्या संघामध्ये सामील होशील?”



रोमांचित होऊन जेस्सी बोलला, “हो!” पण हा सराव शाळा सुटल्यावर होत असे आणि जेस्सी यावेळी नोकरी करण्यासाठी जात असे. प्रशिक्षक रिलेने यावर तोडगा काढला. त्यांनी जेस्सीला शाळेच्या वेळेच्या पंचेचाळीस मिनिटे आधी मैदानावर येण्यास सांगितले. कॉलेजमध्ये जाईपर्यंत जेस्सीची ही सवय कायम राहिली.

सुरुवातीला थोडेफार अतंर धावल्यावर जेस्सी थकून जात असे. कधी कधी त्याला सराव सोडून द्यावासा वाटे. त्याला वाटे की मोठ्या शर्यती जिंकण्याची त्याची पात्रताच नाही.



जेस्सी असं काही बोलू लागला की मग प्रशिक्षक रिले त्याला संयम ठेवायला सांगत. ते नेहमी गमतीने त्याला म्हणत, “लक्षात ठेव, तू हा सराव पुढच्या शुक्रवारनंतर चार वर्षांनी होणाऱ्या शर्यतीसाठी करतोयस.”

फेअरमोंट ज्युनियर हायस्कूलमध्ये शिकताना जेस्सीने आंतरशालेय धावण्याच्या स्पर्धेत प्रथमच भाग घेतला. क्लिव्हलंडमधील सर्व ज्युनियर हायस्कूलचे सर्वोत्तम धावपटू या स्पर्धेत असतील, हे कळल्यावर जेस्सी घाबरला. पण पिस्तुलाच्या गोळीचा आवाज कानात शिरताच त्याची भीती पळून गेली आणि तो वाऱ्याच्या वेगाने धावला. इतर स्पर्धकांना त्याने बरेच मागे टाकले आणि 100 यार्डांची ही स्पर्धा तो जिंकला.

स्पर्धेनंतर प्रशिक्षक रिले जेस्सीच्या आईला म्हणाले, “तुमच्या मुलाकडे पृथ्वीवरील सर्वात असामान्य पाय आहेत. मी म्हणतो त्याचं तुम्हाला कदाचित आश्चर्य वाटेल, पण एक दिवस जेस्सी ऑलिंपिक स्पर्धा जिंकून दाखवेल.” आणखी काही वर्षांनी जेस्सी ऑलिंपिक स्पर्धा जिंकला तेव्हा आईने त्याला त्याच्या प्रशिक्षकांच्या या भविष्यवाणीबद्दल सांगितले.



ज्युनियर हायस्कूलमध्ये असताना ऑलिंपिकच्या दिशेने जेस्सीचे महत्त्वपूर्ण पाऊल पडले. शंभर यार्डांचे अंतर त्याने केवळ दहा सेकंदात पार केले. या विक्रमाची बातमी क्लिव्हलंडच्या वृत्तपत्रांमध्ये छापून आली.

सतत सराव करून जेस्सी आपली कामगिरी सुधारू लागला. स्पर्धेची सुरुवात वेगाने करता यायला हवी, म्हणून प्रशिक्षक रिलेच्या मार्गदर्शनाखाली तो भरपूर मेहनत घेऊ लागला. ईस्ट टेक्निकल हायस्कूलच्या संघात असताना जेस्सी प्रत्येक स्पर्धेत पहिला आला. मग त्याने अडथळ्यांच्या शर्यतीचा सराव सुरू केला.

अडथळ्यांच्या शर्यतीत तीन फुटांपेक्षा जास्त उंच असलेल्या अडथळ्यांवरून उड्या मारत धावावे लागते. यात वेगासोबतच अचूक वेळही महत्त्वाची ठरते. जेस्सी या खेळातही लवकरच विजेता बनला.

पुढे प्रशिक्षक रिले यांच्या सूचनेनुसार जेस्सीने ब्रॉड-जंप स्पर्धेचा सराव सुरू केला. या स्पर्धेला आता आपण लाँग-जंप (लांब उडी) म्हणतो. यात एक स्पर्धक जमिनीवर असलेल्या फळीच्या दिशेने भरधाव वेगाने धावतो. मग फळीवर एक पाय टेकवून तो पुढे झेप घेतो. त्याची उडी वाळूच्या जमिनीवर ज्या भागात पडते त्याला खड्डा म्हणतात. फळीपासून या खड्यात स्पर्धकाची उडी जिथे पडते तिथपर्यंतचे अंतर मोजतात. जेस्सी या खेळातही लवकरच अत्यंत प्रवीण बनला.

1933 पर्यंत जेस्सी ओव्हन्सची ख्याती संपूर्ण राज्यात पसरली. त्या वर्षी शिकागो विद्यापीठात राष्ट्रीय स्तरावरील आंतरशालेय स्पर्धा आयोजीत केली गेली होती. याद्वारे देशभरातील क्रीडा लेखक आणि प्रशिक्षक यांना एक तगडी स्पर्धा पाहायला मिळणार होती. जेस्सी या स्पर्धेबाबत थोडा चिंतित होता.



मात्र त्याने स्पर्धेत ऐतिहासिक कामगिरी केली. त्याने शंभर यार्ड अंतराची स्पर्धा केवळ 9.4 सेकंदात पूर्ण केली. हा आंतरशालेय स्पर्धेतील नवा विश्वविक्रम ठरला. मग लांब उडी स्पर्धेत त्याने 24 फूट, 9 आणि 5/8 इंच एवढी लांब विक्रमी उडी मारली. 220 यार्ड अंतर धावण्याची स्पर्धा त्याने 20.7 सेकंदात पूर्ण करून त्यातही नवा विश्वविक्रम रचला. एका क्रीडा लेखकाच्या दृष्टिने हा एक अभूतपूर्व त्रिविक्रम होता.



जेस्सीने हायस्कूलचे शिक्षण पूर्ण केले तेव्हा साऱ्या अमेरिकेतील कॉलेजांनी त्याला शिष्यवृत्ती देऊ केली. कॉलेजात शिक्षण घेणारा जेस्सी हा कुटुंबातील पहिलाच सदस्य होता. त्यामुळे त्याचे आईवडील आनंदात होते. आता त्यांना त्यांच्या खडतर आयुष्याची पर्वा नव्हती. क्लिव्हलंड शहरात येऊन राहाण्याचा त्यांचा निर्णय योग्य ठरला होता.

जेस्सीला उच्च शिक्षणाची आस होती तसेच कॉलेज स्तरावरील स्पर्धांही खुणावत होत्या. पण काळ सरत चालला तरी जेस्सीने कॉलेजात प्रवेश घेतला नाही. प्रशिक्षक रिले यांना आश्चर्य वाटले. जेस्सीचे म्हणणे होते की आईवडिलांना सोडून जाणे त्याला ठीक वाटत नाही. कारण त्याच्या नोकऱ्यांमुळेच कुटुंबाचा चरितार्थ चालत होता. रिले यांनी जेस्सीला काळजी न करण्यास सांगितले.

आठवड्याभरानंतर रिले यांनी जेस्सीला एक आनंदाची बातमी दिली. ओहायो विद्यापीठ जेस्सीला प्रवेश देण्यास इच्छुक होती. तिथे क्रीडा शिष्यवृत्ती दिली जात नव्हती. पण तेथील अधिकारी जेस्सीसाठी एका नोकरीची व्यवस्था करणार होते. यामुळे त्याचा राहाण्या-खाण्याचा आणि शिक्षणाचा खर्च भागणार होता.



ओहायो विद्यापीठाचे प्रशिक्षक लॅरी स्नायडर यांनी जेस्सीच्या वडिलांसाठीही एक नोकरी शोधली. ही नोकरी कायम स्वरुपाची होती. सर्व काही जेस्सीच्या मनासारखे घडले. मग तो ओहायो विद्यापीठात जाण्यास तयार झाला.




कॉलेजात असतानाच जेस्सीचे नाव जगभर गाजू लागले. 25 मे 1935 रोजी मिशिगन विद्यापीठात आयोजीत केलेल्या राष्ट्रीय आंतरकॉलेज स्पर्धेत जेस्सीने सर्वोत्तम कामगिरी केली. शंभर यार्ड, 220 यार्डांची अडथळ्यांची स्पर्धा आणि लांब उडी या तीनही प्रकारांत त्याने नवे विश्वविक्रम रचले. त्याची उडी एवढ्या लांबवर पडली की पुढील पंचवीस वर्षे तो विक्रम अबाधित राहीला.

जेस्सीची ही कामगिरी 1936 सालच्या ऑलिंपिक खेळांसाठी पूर्वतयारी ठरली. जर्मनीतील बर्लिनमध्ये आयोजित या ऑलिंपिक स्पर्धांमध्ये जेस्सी ओव्हन्सने चार सुवर्णपदके जिंकून आपले वर्चस्व सिद्ध केले. त्याने 100 तसेच 200 मीटर स्पर्धांमध्ये पहिले स्थान प्राप्त केले. शिवाय गटाने चारशे मीटर धावण्याच्या स्पर्धेतही (रिले शर्यत) तो सरस ठरला. लांब उडीमध्ये त्याने चौथे सुवर्णपदक मिळवले. हे विजेतेपद त्याला सर्वाधिक प्रिय होते आणि त्याला कारणही तसेच होते.

1936 साली जर्मनीत हुकूमशहा ॲडॉल्फ हिटलरच्या नाझी पक्षाचे सरकार होते. नाझी इतर साऱ्यांना तुच्छ लेखत. ऑलिंपिक स्पर्धेआधी जर्मन वृत्तपत्रांनी अमेरिकेच्या काळ्या वर्णाच्या खेळाडुंची खूप निर्भत्सना केली. यामुळे शांत स्वभावाचा जेस्सीसुद्धा खवळला.

जेस्सी प्रथम लांब उडी स्पर्धेत उतरणार होता. तो नाझींनी केलेल्या अपमानाने विचलित झाला होता. त्याला स्पर्धेवर लक्ष एकवटणे कठीण झाले. त्यातच जेस्सीचा प्रतिस्पर्धी लझ लाँग हा एक जर्मन होता. तो एक उंच आणि उत्तम धावपटू होता. जर्मन वंशश्रेष्ठत्वाचे एक आदर्श उदाहरण म्हणून त्याच्याकडे पाहिले जात होते. जर्मन लोक हे श्रेष्ठ वंशाचे आहेत, हे सिद्ध करण्यासाठीच जणू ही स्पर्धा चालू आहे, असे काहीसे चित्र दिसत होते.

लांब उडीच्या पात्रता फेरीत पहिल्या दोन प्रयत्नांत जेस्सीची कामगिरी खराब झाली. लझ लाँगची कामगिरी मात्र चांगली झाली. असे वाटू लागले की ही स्पर्धा नाझी खेळाडूच जिंकणार. शेवटच्या प्रयत्नासाठी जेस्सी पुढे आला तेव्हा लझ लाँग त्याच्याजवळ येऊन म्हणाला,




“हॅलो जेस्सी, माझी खूप इच्छा आहे की तू मुख्य स्पर्धेच्या अंतिम फेरीत पोहोचावास. त्यामुळे मन शांत कर आणि लक्षात ठेव, ही केवळ पात्रता फेरी आहे, यात सर्वोत्तम कामगिरी करून दाखवण्याचा ताण घेऊ नकोस, फक्त पात्र होऊन दाखव.” मग लाँगने जेस्सीला पात्र ठरण्यासाठी कशी उडी घ्यावी, याबद्दल सल्ला दिला.



जेस्सीने लाँगचा सल्ला मानला आणि एक चांगली उडी घेतली. तो लाँगप्रती कृतज्ञ होता. यात लाँगच्या सल्ल्यापेक्षा आणखी एक महत्त्वाची गोष्ट होती. लाँग नाझी अधिकाऱ्यांच्या समोर एका काळ्या वर्णाच्या अमेरिकन व्यक्तिबरोबर मैत्रीपूर्ण वागला. लाँगचे धाडस, माणुसकी आणि खिलाडू वृत्ती यांचा जेस्सीच्या मनावर खोल ठसा उमटला.

लांब उडीच्या अंतिम फेरीत लाँगच्या मदतीची परतफेड करण्याची संधी जेस्सीला मिळाली. एक उत्कृष्ट उडी घेतल्यावर लाँग आपला दुखरा पाय पकडून लंगडत चालू लागला. जेस्सी तात्काळ त्याच्याजवळ गेला. लाँगच्या दुखऱ्या पायाला त्याने बराच वेळ मालिश केली. हे दृश्य पाहून नाझी अधिकारी अवाक् झाले.

जेस्सी ओव्हन्सने 26 फूट, 5 आणि 5/16 इंच एवढ्या लांबवर उडी मारून नवा विक्रम केला आणि या स्पर्धेचे सुवर्णपदकही जिंकले. जेस्सी आणि लाँगमध्ये दाट मैत्री झाली. दुसऱ्या महायुद्धात लाँगचा मृत्यू होईपर्यंत ही मैत्री कायम राहीली.

ऑलिंपिकमध्ये उत्तम कामगिरी करून परतल्यानंतर जेस्सी ओव्हन्सचे अमेरिकेत एका हीरोसारखे स्वागत झाले. न्यूयॉर्क शहरात त्याच्या सन्मानार्थ एक भव्य मिरवणूक निघाली. या तरूण महान धावपटुला सर्वांनी मानवंदना दिली. आयुष्यभर जेस्सी लोकांचा आदर आणि कौतुकाचा धनी ठरला.



पुढल्या काही वर्षात जेस्सी ओव्हन्स यांनी युवा आयोगावर काम केले आणि अमेरिकेचे सदिच्छा राजदूत हे पदही भूषवले. 30 मार्च 1980 रोजी मृत्यू होईपर्यंत जेस्सी ओव्हन्स ऑलिंपिक स्पर्धासंबंधित उपक्रमांमध्ये भाग घेत राहिले. विसाव्या शतकाच्या पहिल्या भागात ते “विश्वातील सर्वात वेगवान माणूस” गणले गेले. त्यानंतर त्यांचे सर्व विक्रम मोडले गेले. तरीही क्रीडा क्षेत्राच्या इतिहासात त्यांच्या कर्तृत्वाची कायम नोंद राहील!

समाप्त